गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, (००) ११३, *पोलीस कर्मचारी वर्ग यांचे कल्याण*, या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानामधून ७० टक्के निधी वितरित करणे व खर्च करणे यांकरिता मंजूरी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांक : विनियो-०५१८/प्र.क्र.२०४/सात/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २८ जून २०१८.

वाचा :- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८.

**शासन निर्णय.-**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पात गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, (००) ११३, *पोलीस कर्मचारी वर्ग यांचे कल्याण*, या लेखाशीर्षाखाली एकूण रु.१३,०३,००,०००/- इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ याव्दारे डिसेंबर, २०१८ च्या अखरेपर्यत आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ७० टक्के मर्यादेत वितरीत व खर्च करणे यांकरीता मंजूरी देण्यात आली आहे.

२. त्यानुसार उक्त लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या एकूण अनुदानातून, पुढील तक्त्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे ७० टक्के निधी वितरित व खर्च करणे यांकरिता, याद्वारे, पुढील अटींवर, मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. *(१)* | उपशीर्ष/ उद्दिष्ट *(२)* | एकूण मंजूर अनुदान *(३)* | वितरित निधी *(४)* |
|---|---|---|---|
| १. | (००) (००)(०१) पोलीस कल्याण निधीसाठी अंशदान (अनिवार्य) (२०५५ ०२६६) ३२-अंशदाने. | रु.५०,००,०००/- | रु.३५,००,०००/- |
| २. | (००)(०२) पोलीस कर्मचाऱ्यांना अर्थसहाय्यित दराने जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा (अनिवार्य) (२०५५ ०२७५) ३३-अर्थसहाय्य. | रु. ३,००,०००/- | रु.२,१०,०००/- |

| अ.क्र. (१) | उपशीर्ष/ उद्दिष्ट (२) | एकूण मंजूर अनुदान (३) | वितरित निधी (४) |
|---|---|---|---|
| ३. | (००)(०३) पोलीसांच्या क्रीडा निधीसाठी अंशदान (अनिवार्य) (२०५५ ०२८४) ३२-अंशदाने. | रु.१,००,००,०००/- | रु. ७०,००,०००/- |
| ४. | (००) (०४) कर्तव्य बजावताना जखमी झालेल्या पोलीसांना आणि मृत पावलेल्या पोलीस कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना अनुदान (२०५५ ०२९३) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | रु.९,००,००,०००/- | रु.६,३०,००,०००/- |

**अटी**:-

१) उक्त निधीबाबतचे अभिलेख लेखापरीक्षेसाठी उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

२) उक्त निधीच्या उपयोजनाचे प्रमाणपत्र शासनास (गृह विभाग) व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, यांना सादर करणे बंधनकारक राहील.

**२.** उक्त खर्च हा, गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, (००) ११३, पोलीस कर्मचारीवर्ग यांचे कल्याण, या लेखाशीर्षाखाली वरील तक्त्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, चालू (सन २०१८-१९) वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** उक्त निधी कोषागारातून काढण्याच्या प्रयोजनासाठी विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य, यांना नियंत्रक अधिकारी आणि कार्यालय अधीक्षक, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांचे कार्यालय, मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी, म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८, अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७१९११३४२६७१२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.07.19 11:39:39 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा. गृह राज्यमंत्री (शहरे/ ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) कार्यालय अधीक्षक, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांचे कार्यालय, मुंबई.

**प्रत:-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६) अवर सचिव (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल, पोल-७.